सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजनेस सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षातील निधी वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. अपअ-२०२४/प्र.क्र.२२/का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २९/०३/२०२५

**वाचा-१.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१/०४/२०२४
**२.** शासन निर्णय क्र. अपअ-२०२४/ प्र.क्र.२२/ का-९, दिनांक-२०/६/२०२४
**३.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१७/३/२०२५

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाचा १९५८ चा अधिनियम व महाराष्ट्र अपराधी परिविक्षा अधिनियम, १९५८ अंतर्गत ही योजना राबविण्यात येते. मा. न्यायालयाच्या आदेशानुसार मुक्त केलेले परिविक्षाधीन /मुक्त बंदी/कारागृहातील शिक्षा भोगत असलेले बंदी यांनी शासनाकडे पुनर्वसनासाठी मागणी केल्यास त्यांना दि. १४/१०/२०१६ व दि. १३/०६/२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार रु. २५,०००/- पर्यंत आर्थिक स्वरुपात सहायक अनुदान दिले जाते.

सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना (कार्यक्रम) (२२३५०११३) ३१ सहायक अनुदान या उद्दिष्टाखाली रु. ४४.०० लक्ष निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला असून त्यापैकी उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयाद्वारे रु. १४,५२,०००/- (अक्षरी रु. चौदा लक्ष बावन्न हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सन २०२४-२५ च्या सुधारीत अंदाजात प्राप्त रु.३०,८०,०००/- (अक्षरी रु. तीस लक्ष ऐंशी हजार फक्त) एवढ्या निधीपैकी उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

महिला व बाल विकास विभागांतर्गत “सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना” या योजनेसाठी सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षात मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०६ सुधार सेवा, (०१) सराईत अपराधी व अपराधी परिवीक्षा योजना, (०१) (०१) सराईत अपराधी व अपराधी परिवीक्षा योजना (कार्यक्रम) (२२३५-०११३) या लेखाशीर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली या शासन निर्णयाद्वारे रु.१६,२८,०००/-(अक्षरी रुपये सोळा लक्ष अठ्ठावीस हजार फक्त) इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी वितरीत करताना वित्त विभागाच्या दि.०१/०४/२०२४ व दि.१७/३/२०२५ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद अटी/शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३.	सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याची दक्षता घ्यावी व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात यावे.

४.	सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ अनुक्रमे १२९/१४७२, दि.२१/०३/२०२५ व क्र. १२३/व्यय-६, दि. २६/०३/२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२९१४४३४४५७३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEELIMA PRAMOD CHAUDHARI

Digitally signed by NEELIMA PRAMOD CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2d492c577d5f8956310c91dc01ffb9a071206c77d27a3be4e52d7c1b29fcf933, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA21FB5959CBBFBF3AA97101D99F5D77D2333AE1AC39229E507A3EBF86EC6CD4, cn=NEELIMA PRAMOD CHAUDHARI
Date: 2025.03.29 14:44:40 +05'30'

**(नीलिमा चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. परिविक्षा अधिक्षक, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालया मार्फत)
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. निवड नस्ती (का-९)